**तारदाळ, ता.हातकणंगले, जि.कोल्हापूर येथील कल्लाप्पाण्णा आवाडे को-ऑप. इंडस्ट्रियल इस्टेट ॲण्ड इंटिग्रेटेड टेक्स्टाईल पार्क लि. या सहकारी संस्थेच्या जागेवर वाहनाच्या योग्यता प्रमाणपत्राच्या करीता ब्रेक टेस्ट ट्रॅक सुरु करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन निर्णय क्रमांकः एमव्हिडी ०८२२/प्र.क्र.२१२/परि-४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: ०२ मार्च, २०२३

**संदर्भ :**

परिवहन आयुक्त कार्यालय, महाराष्ट्र राज्य,मुंबई यांचे पत्र क्र.काईबा (०१)/०६१७/न.क्र. १४ / का-१०(१)/जा.क्र.१३६९० दि. ९ डिसेंबर,२०२२.

**प्रस्तावना :**

तारदाळ, ता.हातकणंगले, जि.कोल्हापूर येथील कल्लाप्पाण्णा आवाडे को-ऑप. इंडस्ट्रियल इस्टेट ॲण्ड इंटिग्रेटेड टेक्स्टाईल पार्क लि. या सहकारी संस्थेच्या जागेवर वाहनाच्या योग्यता प्रमाणपत्राच्या करीता ब्रेक टेस्ट ट्रॅक सुरु करणेबाबतचा प्राप्त झालेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय-**

तारदाळ, ता.हातकणंगले, जि.कोल्हापूर येथील कल्लाप्पाण्णा आवाडे को-ऑप. इंडस्ट्रियल इस्टेट ॲण्ड इंटिग्रेटेड टेक्स्टाईल पार्क लि. या सहकारी संस्थेच्या जागेवर वाहनाच्या योग्यता प्रमाणपत्राच्या करीता ब्रेक टेस्ट ट्रॅक सुरु करण्यासाठी खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

अ) सदर रस्त्यावर वाहनाची चाचणी सुरु करणे अपेक्षित आहे तिथून २५० मी. अंतरावर तीव्र उताराचा खडकाळ रस्ता असल्याने संभाव्य अपघात रोखण्यासाठी त्या बाजूंना क्रॅशगार्ड लावण्यात यावे.

आ) सदर रस्त्याच्या बाजूच्या मालमत्ता धारकांचे कारखाने/ गोडाऊन यांची सदर रस्त्यावर उघडणारे दरवाजे कायमस्वरुपी बंद करुन त्यातून होणारी माणसांची आणि वाहनांची रहदारी संपूर्णपणे प्रतिबंधित करावी.

इ) सदर रस्त्यावरुन होणारी संपूर्ण सार्वजनिक वाहतूक बंद करुन मालकी असणाऱ्या कल्लाप्पाण्णा आवाडे टेक्सटाईल पार्क या संस्थेने सदर रस्ता परिवहन विभागाकडे नि:शुल्क हस्तांतरीत करावा.

ई) ब्रेक टेस्ट पासिंग ट्रॅक जिथून सुरु होणार त्या बाजूस बॅरिकेटींग लावून संभाव्य सार्वजनिक वाहतूक रोखण्यात यावी.

उ) सदर रस्त्याची रुंदी आणि त्याचे स्वरुप लक्षात घेता, ब्रेक टेस्ट पासिंग ट्रॅकवर केवळ हलक्या मोटार वाहनांसाठी म्हणजेच एम-१, एन-१ या संवर्गातील वाहनांची तपासणी करण्यात यावी.

२. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य,मुंबई यांनी सदर ब्रेक टेस्ट ट्रॅक सुरु करणेबाबत नियमानुसार पुढील कार्यवाही करावी व केलेल्या कार्यवाहीबाबत शासनास अवगत करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३०२१२५२२६६९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LANGHI BHARAT R

Digitally signed by LANGHI BHARAT R
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=adedcaf1e22746fc379c4d04972c090c93ed255751866f45a6b130031dd33559, pseudonym=B2922612E606733B1ABC8BE253ADA57B2D4704C4, serialNumber=49CE1A18F73B9A209085E92127FE59850F0B387403911C9F82C1EBF9BE2AB089, cn=LANGHI BHARAT R
Date: 2023.03.02 12:56:34 +05'30'

**( भरत लांघी )**

अवर सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. प्रादेशिक परिवहन अधिकारी, कोल्हापूर
५. निवडनस्ती/परि-४.